**जनहित याचिका क्र. १७३/२०१०**
**डॉ.महेश बेडेकर विरूध्द महाराष्ट्र शासन व इतर**
**(मंडप तपासणी संनियंत्रण समिती स्थापन करण्याबाबत)**

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

## शासन परिपत्रक क्रमांकः न्यायाप्र २०१६/प्र.क्र.१२७/(भाग-१)/नवि-१७

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: ०६ मार्च,२०१७

वाचा

१. शासन परिपत्रक, नगर विकास विभाग, क्र. याचिका २०१५/ सं.क्र. ८७८(१)/नवि ३४, दिनांक ६ जुलै, २०१५.
२. मा. उच्च न्यायालयाचे जनहित याचिका क्र. १७३/२०१० संदर्भात दिनांक १०,११,१२ व १६ ऑगस्ट, २०१६ रोजी दिलेले आदेश.
३. शासन परिपत्रक, नगर विकास विभाग, क्र. न्यायाप्र २०१६/ प्र.क्र. १२७/नवि १७, दिनांक १९ नोव्हेंबर, २०१६.

### प्रस्तावना:-

ध्वनी प्रदुषण नियम २००० व रस्त्यावर / पदपथावर / पादचारी मार्गावर तात्पुरत्या स्वरूपात मंडप वा तत्सम रचना उभारण्याच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे जनहित याचिका क्रंमाक १७३/२०१० डॉ.महेश बेडेकर विरूध्द महाराष्ट्र शासन दाखल करण्यात आलेली आहे. या याचिकेवरील सुनावणी दरम्यान मा.न्यायालयाने दि. १०,११,१२ व १६ ऑगस्ट, २०१६ रोजी सविस्तर आदेश दिलेले आहेत. त्यानुषंगाने महानगरपालिका क्षेत्रामध्ये शासनाने संदर्भाधिन क्र. ३ वरील दिनांक १९ नोव्हेबर, २०१६ रोजीच्या परिपत्रकान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. तथापि, मा. उच्च न्यायालयाच्या आदेशांची अंमलबजावणी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेकडून सुयोग्य रित्या होत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आलेले आहे. त्यामुळे मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार महानगरपालिका क्षेत्रामध्ये मंडप तपासणीबाबतची कार्यवाही अधिक प्रभावीपणे होण्यासाठी जिल्हानिहाय “मंडप तपासणी संनियंत्रण समिती” गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

### परिपत्रक:-

जनहित याचिका क्रमांक १७३/२०१० संदर्भात मा. उच्च न्यायालयाने दिनांक २४ जून, २०१५ व दि. १०,११,१२ व १६ ऑगस्ट, २०१६ रोजी दिलेल्या आदेशानुसार महानगर पलिका क्षेत्रांमध्ये सार्वजनिक सण / उत्सव / समारंभ यासाठी उभारण्यात येणाऱ्या मंडप / पेंडॉल तपासणीबाबत संबंधित जिल्हाधिकारी यांच्यामार्फत तहसीलदार अथवा त्यावरील अधिकाऱ्यांच्या गठित करण्यात आलेल्या मंडप तपासणी पथकामार्फत सार्वजनिक उत्सव / समारंभ सुरू होण्यापुर्वी पुरेशा कालावधी अगोदर मंडप / पेंडॉल तपासणी होणे, त्यासंदर्भातील वस्तुनिष्ठ तपासणी अहवाल संबंधित सक्षम प्राधिका-यांकडे यांच्याकडे आवश्यक कार्यवाहीसाठी सादर करणे, इत्यादी कार्यवाही अधिक प्रभावीपणे होण्यासाठी शासन प्रत्येक महानगर पालिकेकरीता जिल्हाधिकारी यांनी खालीलप्रमाणे महानगरपालिका निहाय मंडप / पेंडॉल तपासणी संनियंत्रण समिती/ समित्या गठित करण्याचे आदेश देत आहे.

महानगर पालिका क्षेत्रांकरीता जिल्हानिहाय संनियंत्रण समिती खालीलप्रमाणे गठित करण्यात यावी.

१. उप विभागीय अधिकारी - अध्यक्ष

२. सहायक / उप आयुक्त महानगरपालिका / - सदस्य.

३. सहायक पोलिस आयुक्त / पोलिस उपअधीक्षक - सदस्य.

उपरोक्तप्रमाणे गठित करण्यात आलेल्या जिल्हानिहाय मंडप तपासणी संनियंत्रण समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील.

१. मंडप तपासणी संनियंत्रण समिती गठित करण्याबाबतच्या आदेशामध्ये समितीचे अध्यक्ष व सदस्य यांचा नावानिशी उल्लेख असणे आवश्यक आहे.

२. जिल्हाधिकारी यांनी आवश्यकतेनुसार एक किंवा अधिक परंतु तीनपेक्षा जास्त नसतील अशा मंडप तपासणी संनियंत्रण समिती गठित करण्याबाबत त्यांच्या स्तरावर निर्णय घ्यावा.

३. मंडप तपासणी संनियंत्रण समिती सार्वजनिक सण / उत्सव / समारंभासाठी उभारण्यात येणाऱ्या मंडपांच्या तपासणीकरीता मंडप तपासणी पथक / पथके गठित करण्याबाबत तसेच सदर पथक / पथकांच्या क्षेत्राबाबत उचित प्रस्ताव संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे **प्रत्येक वर्षाच्या जानेवारी महिन्याच्या १० तारखेपर्यंत** सादर करील, त्यानुषंगाने संबंधित जिल्हाधिकारी यांनी **जानेवारी महिन्याच्या २१ तारखेपर्यंत** मंडप तपासणीचे पथक / पथके गठित करण्याबाबतचे आदेश निर्गमित करणे बंधनकारक राहील.

४. मंडप तपासणी संनियंत्रण समिती गठित करण्यात आलेल्या मंडप तपासणी पथक / पथके यांना सोबत जोडलेल्या विवरणपत्र क्रमांक १ नुसार स्थानिक वृत्तपत्रे, दुरचित्रवाहिनी, रेडिओ व अन्य प्रसारमाध्यमाद्वारे **व्यापक प्रसिध्दी** देण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करील. तसेच गठीत करण्यात आलेले मंडप तपासणी पथकाची माहिती सर्व शासकीय कार्यालयामध्ये दर्शनीय भागावर प्रदर्शित करील.

५. मंडप तपासणी संनियंत्रण समिती जिल्हाधिकारी यांच्या मार्फत गठित मंडप तपासणी पथक आपल्या कार्यक्षेत्रामधील सर्व मंडप / पेंडॉल यांना सार्वजनिक सण / उत्सव / समारंभापुर्वी **सात दिवस अगोदर** नियमित भेटी देतील याबाबत संबंधित पथकांना उचित आदेश देऊन कार्यवाहीचे संनियंत्रण करील.

६. मंडप तपासणी संनियंत्रण समिती मंडप तपासणी पथकाकडून तपासणीबाबतचा वस्तुनिष्ठ अहवाल विहीत कालमर्यादेत ( सण /उत्सव / समारंभ सुरू होण्यापुर्वी **तीन दिवस अगोदर** ) प्राप्त करून घेऊन एकत्रितपणे सक्षम प्राधिकाऱ्याकडे त्वरीत आवश्यक त्या कार्यवाहीसाठी सादर करील.

७. मंडप तपासणी पथकामार्फत सादर करण्यात आलेल्या अहवालावर सक्षम प्राधिकाऱ्याने केलेल्या कार्यवाहीचा त्रै-मासिक अहवाल सोबतच्या विहित विवरणपत्र क्रमांक २ मध्ये शासनास नियमीतपणे सादर करण्याची जबाबदारी मंडप तपासणी संनियंत्रण समितीची राहील.

८. सदर प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशाचा अवमान होणार नाही, याबाबत आवश्यक ती दक्षता मंडप तपासणी संनियंत्रण समितीने घ्यावी. याबाबत मा. उच्च न्यायालयाच्या आदेशांचा अवमान झाल्यास त्याची सर्व जबाबदारी मंडप तपासणी संनियंत्रण समितीची राहील.

९. सदरचे शासन परिपत्रक गृह विभाग व महसूल व वन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०६१७०७३६१६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.03.14 17:24:52 +05'30'

**(ज.ना. पाटील)**
सह सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२. मा. मंत्री (सर्व), मंत्रालय, मुंबई - ३२.
३. मा.राज्यमंत्री (सर्व), मंत्रालय, मुंबई - ३२,
४. मा.विधानसभा / विधानपरिषद सदस्य (सर्व).
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई - ३२,
६. अपर मुख्य सचिव(गृह) मंत्रालय, मुंबई - ३२,
७. प्रधान सचिव (महसूल), मंत्रालय, मुंबई - ३२,
८. प्रधान सचिव (नगर विकास १ / २), मंत्रालय, मुंबई - ३२.
९. सर्व विभागीय आयुक्त.
१०. सर्व महानगर पालिका आयुक्त.
११. सर्व जिल्हाधिकारी.
१२. सह सचिव / उप सचिव,(गृह / नगर विकास / महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई -३२,
१३. निवड नस्ती कार्यासन नवि-१७,

## विवरणपत्र क्रमांक १

## मंडप / पेंडॉल तपासणी पथकांबाबत प्रसिध्दीपत्रक

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे उपस्थित जनहित याचिका क्र. १७३ / २०१० संदर्भात सार्वजनिक सण / उत्सव /समारंभ याप्रसंगी उभारण्यात येणाऱ्या मंडप / पेंडॉलच्या तपासणीच्या अनुषंगाने दिलेल्या आदेशानुसार ----- जिल्हातंर्गत --------महानगरपालिका / हद्दीमधील मंडप / पेंडॉल तपासणी करण्याबाबत खालीलप्रमाणे तपासणी पथक / पथके गठित करण्यात आलेले आहेत. सदर तपासणी पथकांची माहिती खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | तपासणी पथक सदस्याचे नाव | पदनाम | कार्यालयीन दुरध्वनी क्रंमाक | मोबाईल क्रंमाक/ व्हाट्स अप क्रंमाक | ई-मेल आयडी |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |
| | | | | | |

तरी, नागरिकांनी सार्वजनिक सण / उत्सव /समारंभ याप्रसंगी उभारण्यात येणाऱ्या मंडप / पेंडॉलच्या संदर्भात कोणतीही तक्रार असल्यास उपरोक्त विवरणपत्रामधील नमूद तपासणी पथक सदस्यांशी संपर्क साधावा.

जिल्हाधिकारी: - ----------

**विवरणपत्र क्रमांक २**

**मंडप तपासणी बाबतची माहिती**

| अ.क्र. | महानगरपालिका | तपासणी पथक गठीत करण्यात आलेल्या आदेशाचा दिनांक (आदेशाची प्रत सोबत जोडावी) | पथकाचा तपशील प्रसिध्द केलेल्या माध्यमाचे नाव (वेबसाईट / वर्तमानपत्र इ.) (प्रत सोबत जोडावी.) | गठीत करण्यात आलेल्या पेंडाल तपासणी पथकाची संख्या | उत्सवाचे नाव, दिनांक व कालावधी | तपासणी पथकांनी एकुण भेटी दिलेल्या पेंडालची संख्या | पथकाने पेंडालला भेटी दिलेल्या तारखांचा तपशिल | तपासणीत आढळून आलेल्या परवानगी शिवाय उभारण्यात आलेल्या तसेच शर्तभंग झालेल्या पेंडालची संख्या | रकाना क्र. ९ संदर्भात मंडपांचा तपशिल सक्षम प्राधिकाऱ्यास कळविल्याचा दिनांक | रकाना क्र. ९ संदर्भात सक्षम प्राधिकाऱ्यांकडून करण्यात आलेल्या कार्यवाहीचा तपशिल |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| | | | | | | | | | | |